# उमलत्या कळ्या

( काव्यसंग्रह )

" किरण "

प्रथमावृत्तिः ऑक्टोबर १९३५.

किंमत अकरा आणे.

# उमलण्यापूर्वी-

गेल्या पांच वर्षांतील माझ्या अनेक स्फुट कवितांपैकीं लहानमोठ्या पन्नास कवितांचा या पुस्तकांत संग्रह केला आहे. यांपैकीं जवळ जवळ निम्या कविता निरनिराळ्या प्रमुख नियतकालिकांतून वेळोवेळीं प्रसिद्ध झालेल्या आहेत. प्रेमापासून तों पावसापर्यंत, सांडलेल्या शाईपासून तों सिगारच्या झुरक्यापर्यंत, आणि शिवराय–लोकमान्यांपासून तों नेहमींच्या डाकवाल्यापर्यंत कविता-विषयांची विविधता आहे.

" रेशमाहुनी मृदुला,
पोलादाहुनि प्रबला,
गाउं चला काव्याला, आजकालला ! "

हें माझें ध्येय आहे. तरी वाचकांनीं या ठिकाणीं एक गोष्ट मात्र लक्षांत ठेवली पाहिजे. एकादें ध्येय डोळ्यासमोर ठेवून त्याप्रमाणें प्रयत्न करूं लागलें व कार्याची दिशा आंखून घेतली, तरी पहिल्याच प्रयत्नाला त्या ध्येयाची परिपूर्णता होईल असें नाहीं–बहुधा होणारच नाहीं. वरील ध्येय ही माझ्या काव्याची मीच ठरवलेली कसोटी असली तरी प्रस्तुत काव्यसंग्रह त्या कसोटीवर पूर्णपणें निर्भेळ ठरेल किंवा ठरलाच पाहिजे असा माझा मुळींच आग्रह नाहीं; तरी तें ध्येय गांठण्याच्या मार्गावर– फार नाहीं तरी–पहिलें पाऊल मी टाकलें आहे असें आत्मविश्वासपूर्वक सांगण्यासही मला कोणताच प्रत्यवाय दिसत नाहीं.

साहित्याच्या प्रांतांत सध्यां जर कोणाची अत्यंत दुर्दशा असेल तर ती कवींची. कवि आणि त्याचें काव्य म्हटलें, कीं सामान्य वाचकांच्या—आणि त्यांच्याच भिस्तीवर अवलंबून असणाऱ्या प्रकाशकांच्या —कपाळास आंठ्या पडल्याच पाहिजेत ! सध्यां " कवि " ही एक प्रकारची तुच्छतादर्शक ' शिवी ' होऊन बसली आहे. याला उलट-

सुलट अनेक कारणें आहेत; पण त्यांचें विवरण करणें या स्थळीं योग्य नव्हे. फक्त वस्तुस्थिति–दिग्दर्शन केलें आहे इतकेंच !

अशी परिस्थिती असतां मी आपला काव्यसंग्रह प्रसिद्ध करणें हा निव्वळ खुळेपणा आहे असें पुष्कळ वाचकांस वाटेल; आणि नफ्या-तोट्याचें कोडें केवळ पैशांत सोडविणारांच्या दृष्टीनें वरील विधान अगदीं सत्य आहे, ही गोष्ट मला मान्य आहे. अशा "व्यवहारकुशल" लोकांना माझें एवढेंच सांगणें आहे, कीं या पुस्तकाच्या मुद्रणखर्चाचा भार त्यांच्यावर पडण्यासारखा नाहीं आणि मला होणारा आर्थिक तोटा भरून काढण्याची जबाबदारीही त्यांच्यावर लादली जाण्याचा संभव नाहीं.

खरें सांगायचें म्हणजे हा काव्यसंग्रह प्रसिद्ध करण्यासाठीं मला कोणी विनंत्या, आग्रह, अत्याग्रह, गळ, निकड, सूचना इत्यादींत मोडणारे प्रकार मुळींच केले नाहींत. मीच मला सूचना केली आणि मीच मला आग्रह केला. मी माझी ही कल्पना माझ्या मोजक्याच पण जिवलग मित्रांपुढें मांडली असतां त्यांनीं मला इतकें सक्रिय प्रोत्साहन दिलें, कीं तें केव्हांच विसरतां येणार नाहीं. विनंत्या आणि आग्रह करून नंतर गप्प बसण्यापेक्षां कार्य चालू होतांच प्रोत्साहन देऊन त्याबद्दल आपलेपणा बाळगणें जास्त महत्वाचें आणि परिणामकारक असतें. हेंच कार्य माझ्या मित्रांनीं करून मला आपले कायमचे ऋणी करून ठेवलें आहे. या संग्रहापैकीं ज्या कित्येक कविता निरनिराळ्या नियतकालिकांतून प्रसिद्ध झालेल्या आहेत त्यांच्या संपादकांचे आभार मानलेच पाहिजेत. त्यांच्याकडून मिळालेलें प्रोत्साहन मला विसरतां येणार नाहीं. कविता छापतांना संपादकांनीं त्यांच्या मताप्रमाणें जे क्वचित बदल केले ते तसे सुधारून न घेतां मी मूळ कविता जशी होती तशीच दिली आहे. कांहीं ठिकाणीं जुने पाठ मीच सुधारून घेतले आहेत.

कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजचे एक प्रसिद्ध कवि श्रीयुत **विश्वनाथ वामन पत्की** [ B. A. (Hons.) ] यांनीं मित्रभावानें वेळांत वेळ काढून, पुस्तकाचें हस्तलिखित तपासून छपाईच्या शुद्धीकरणाकडे विशेष लक्ष दिलें यासंबंधीं त्याचे आभार मानावे तितके थोडेच होतील. त्यांची माझी पूर्वीची कांहींच ओळख नसतां त्यांनीं या कामाविषयीं आस्थेवाईक आपलेपणा दाखविला याबद्दल मी त्यांचा अत्यंत ऋणी आहे. त्याचप्रमाणें त्याच कॉलेजांतील माझे एक मित्र श्री. **रामभाऊ लिमये** यांनींही छपाईसंबंधीं बरीच काळजी घेतली आणि अपेक्षित सहाय्य दिलें म्हणून त्यांचेही येथें मनःपूर्वक आभार मानतों. त्याचप्रमाणें या माझ्या प्रकाशनाला जोरदार प्रोत्साहन देण्याचे कामीं माझ्या एक प्रिय धर्मभगिनी सौ० **उषाताई कानिटकर** ( सुलाखे ), एरंडवणा कॉलेज, पुणें, माझा मामेभाऊ **श्रीकृष्ण तांबे** ( सेंट झेवियर्स कॉलेज, मुंबई. ), माझे प्रिय मित्र **रामा रानडे–वसंत महाबळ–विसू गोगटे** ( स. प. कॉलेज, पुणें ) **नारायण जोगळेकर** ( रत्नागिरी ), **राजाभाऊ गोडबोले** ( होळकर कॉलेज, इंदूर ), **द. बा. पळघे** ( ख्रिश्चन कॉलेज, इंदूर ) आणि **श्री. स. आ. दांडेकर** ( सातारा ) यांनीं पुढाकार घेतल्यामुळेंच हें कार्य सुलभपणें तडीस जात आहे; म्हणून या सर्वांचाही मी फार आभारी आहे. यांचें ऋण फेडतां येणें अशक्य, पण शब्दांनीं फेडूं म्हटलें तरीसुद्धां शब्दांचा तुटवडाच पडेल.

पुस्तकाची छपाई व सजावट आकर्षक करण्यासाठीं आणि तें शक्य तितक्या लवकर छापून देण्यासाठीं कोल्हापूरच्या श्रीज्ञानेश्वर प्रेसचे मालक श्री. सहस्रबुद्धे व व्यवस्थापक श्री. पोंक्षे यांचे अवश्यच आभार मानले पाहिजेत. छपाई घाईनें झाल्यामुळें मुद्रादोष बरेच झाले आहेत. **शुद्धिपत्राप्रमाणें वाचकांनीं आधीं चुका सुधारून घ्याव्या म्हणजे समजुतीचा घोटाळा होणार नाहीं.**

एका हातानें टाळी वाजत नाहीं. कवीला जशी काव्याची स्वयंस्फूर्ती पाहिजे त्याचप्रमाणें रसिकांकडून जर त्याला उत्तेजन मिळत

गेलें तर फार मोठें कार्य होतें. झाडावर कळी जन्माला येते पण ती उमलण्यास सूर्याचे किरण आवश्यक असतात.

हें काव्य म्हणजे '**नित्यपाठ भजनमाला**' नसल्यामुळें 'पहिल्या चरणांची सूची' देण्याचा व्यर्थ खटाटोप केला नाहीं.

शेवटीं —

**मम काव्य**
**नसे मुळिं श्राव्य**
**असें जरि वाटे**
**विनवितों मजवरी मोडुं नका बोटें !**

एवढीच नम्रभावाची विनवणी करून वाचकांचा निरोप घेतों.

— वन्दे मातरम् —

इंदूर
१०–१०–३५.

सर्वांचाच,
" **किरण** "

———

# आधीं अशुद्धें सुधारून घ्या.

## शुद्धिपत्र.

घाईघाईनें छपाई झाल्यामुळें अशुद्धें बरींच रहालीं आहेत. त्यांतलीं **आवश्यक** तेवढींच खालीं सुधारलीं आहेत. मुख्य कवितेला ( शीर्षक व 'जाति' सोडून ) सुरवात होते तेथपासून **ओळींचें आंकडे** आहेत. कवितेच्या अंतरांतलें **आंकडे वा फुल्या** ओळींत धरल्या नाहींत.

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध रूप. | शुद्ध रूप. |
|---|---|---|---|
| १ | १ | उमलल्या ' | उमलत्या ' |
| ,, | ३ | जाइजुई | जाईजुई |
| ,, | ९ | फुल नाहिं | फुल नाहीं |
| २ | ५ | मुषकसम | मूषकसम |
| ३ | जाति | भिल्लीण शाकी | भिल्लीण दीडकी |
| ५ | ५ | झोका. | 'झोका' |
| १० | तारीख | ८-७-१९३५ | ८-७-१९३४ |
| १६ | तारीख | १९२२ | १९३२ |
| १७ | ३ | इथुनि | इथुनी |
| २० | ८ | तावुनि | तावुनी. |
| २६ | ६ | उञ्चावरी | उन्चावरी |
| २८ | १२ | बहुत इथवरि | बहुत दूरवरि |
| ३० | ६ | त्या | त्यां |
| ३२ | ११ | झापल्यास | झोंपल्यांस |
| ३४ | १४ | ताच | तोच |

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध रूप. | शुद्ध रूप. |
| --- | --- | --- | --- |
| ३८ | ७ | जोडप | जोडपें. |
| ४२ | १६ | दावूं | दावुं |
| ४५ | १० | चिंता | चिता |
| ४६ | १० | कष्टावीन | कष्टावीण |
| ४९ | २ | धींर | धरिं |
| ५० | ७ | तय | तया |
| ५२ | ५ | टाका | टांका. |
| ५५ | १३ | साथ | सार्थ. |
| ,, | १६ | आजकालच | आजकालचें |
| ५९ | १२ | तरी | तरि |
| ६१ | ५ | सृष्टीचें | सृष्टिचें |
| ६५ | ८ | शिंपला देच प्राण | शिंपला हेंच माप. |
| ६५ | १३ | दे | हें |
| ६८ | १० | अशी | अटी |
| ६८ | ११ | घेऊनियां | घेऊनीयां. |
| ७२ | १० | बर | बरें. |
| ७४ | ८ | धरूनी | धरुनी. |
| ७७ | ५ | तुझ्याविन | तुझ्याविना |
| ८३ | ९ | होईल | होइल. |
| ८६ | ६ | आतां | अतां |
| ८७ | ११ | आमटींत | आमटिंत |
| ८८ | १ | वासरु | वत्स. |
| ८८ | १६ | मोर | मोरें |

———

# उमलत्या कळ्या

ध्येय :

रेशमाहुनी मृदुला
पोलादाहुनि प्रबला
गाउं चला, काव्याला, आजकालला !

-- १९३५ --

" किरण "

# वंदे मातरम् !

आपल्या एकुलत्या एक पुत्राला काव्यकलेचा अनुग्रह
होण्यासाठीं जिनें, मी दोन वर्षांचाच असतांना,
परमेश्वराला प्रसन्न करून त्याच्याशीं माझी शिफारस
करण्याकरितां स्वर्गारोहण केलें; आणि जिच्या
कृपाप्रसादानें काव्यचंद्राची प्रतिपच्चंद्ररेखा
मला उपलब्ध झाली त्या माझ्या पूज-
नीय मातेच्या पवित्र स्मृतीस
हा ग्रंथ अत्यादरानें

**समर्पण**

—" किरण. "

" किरण "-

कवीकृत आगामी काव्यग्रंथ

( २ )

# प्रकाश

( ३ )

# आकाशगंगा

१९३७ व १९३९ मध्यें प्रसिद्ध होतील.

कळी पहिली-

# उमलत्या कळ्या !

[ प्रस्तावना ]

या 'कळया उमलल्या'—अजुनि न पूर्णप्रफुल्ला—
तों तोंच करितसें अर्पण त्या तुम्हाला !

हृदयाची जाइजुई, लता काल्पनिका !
त्या लतेपासुनी खुडलेल्या या कलिका !

मनिं अधिर होउनी असेल झाली घाई !
परि सांभाळुनि घ्या—मुलास जैशी आई !

वास्तविक करावीं अर्पण सुमनें फुल्ल !
परि जवळीं नसतां आणुं कोठलीं बोल ?

फुल नाहिं अन् पाकळी फुलाची नाहीं !
घ्या गोड मानुनी गरिबाची '**कलिका**' ही !

---

इंदूर.
८–८–१९३५.

कळी दुसरी–

# अमर अम्ही बनणार !

करद्वया जोडुनी नमितसें तुजला गजवदना–
पूजन व्हावें तुझें भक्तिभावानें प्रतिसदना !
अमित अमानुष तुझे पराक्रम मतिला कुंठविती–
कर्मयोग तव पुरस्कृतीचा आदर्श दिगंतीं
मुषकसम मुर्दाड वाहनावरी होउनी स्वार
साधूरक्षण दुष्टविनाशाचा तुमचा निर्धार
साधन अथवा वाहन कैसें असो नाहिं चिन्ता !
शुण्डादण्डें अरि दंडाया सिद्ध समय येतां
कैसा येवो प्रसंग तुम्ही कधीं नाहिं खचणार !
लीलेनें संघटित संकटांतुनी पार पडणार !
" कर्तव्य करीं कर्म आपुलें ज्या-त्याला कथणार
आळशापरी काळ न कंठीं होउनियां भूभार ! "

× × ×

गजानना ! आणखी एकदां नमन तुला करणार–
उपदेशामृत तव सेवोनी अमर अम्ही बनणार !

---

इंदूर.
८–८–३५

## कळी तिसरी–

# बालपण !

खरोखर ! पुनः बालपण लाभावें असें मोठेपणीं आपणांस अगदीं मनापासून वाटत असतें. पण तें केव्हांच लाभत नाहीं.

( जाति—भिल्लीण शाकी )

तो आठवुनी, काळ मनीं, फक्त झुरावें–
अथवा विसरावें !
वर मागावा–' हे देवा करुनि कृपेला–
दे बालपणाला ! ' ध्रु०
बाळपणींचा काळ कुणा प्रियकर नाहीं ?
सांगा लवलाहीं !
बालपणींच्या बागेंतिल बागडण्याला
दे बालपणाला !
कसली चिंता, नच चित्ता काळ मजेचा–
तो बाळपणाचा !
मग देवा ! कां छपुनी तो चोरुनि नेला ?
दे बालपणाला !
मातेच्या माण्डीवर बैसून रहावें–
झोंपूनहि जावें–
बोबडबोलां बोलुनि रमवावें तिजला–
दे बालपणाला !

जमवोनी खेळगडी बहु खेळत जावें–
दुडदुड धावावें !
हा ध्यास असा बालपणींचा सर्वांला
दे बालपणाला !
मांडुनियां भातुकलीचा खेळ खळांत–
बहु आनंदांत
गोकुळिंच्या गोपांपरि गंमत करण्याला–
दे बालपणाला !
हा इकडे, तो तिकडे वणवा झळझळित–
या संसारांत !
विश्राम कसा यांतुन मिळणार जिवाला ?
दे बालपणाला !

---

पुणें.
२४–१–३५.

प्रकाशन :
मुलांचें मासिक, नागपूर.
ऑक्टोबर १९३५.

## कळी चौथी-

# " झोंपाळ्यावरी "

ग्यालरींतील झोंपाळ्यावर मुली गाणें गात आहेत.

( जाति—झिम्मा )

झोंपाळ्यावरी ग !
बैसोनी तरी !
गाणें गाऊं, गात राहूं या सुरावरी—झोंपाळ्यावरी !

यशवंतांची 'आई' गाऊं–
गिरीशांचा झोका घेऊं
हेंही गाऊं, तेंही गाऊं गंधर्वांपरी—झोंपाळ्यावरी !

चिवचिंवतो पोपट—
भरलें नाहीं का रे पोट ?
उगी बाळा, गाणें गातें मी तूझ्यावरी—झोंपाळ्यावरी !

करकरतो झोंपाळा—
लागला कां ऐसा चाळा ?
घेवोनी तेलाचा बोळा फांसू जिव्हारीं—झोंपाळ्यावरी !

सृष्टीदेवीचा देखावा
सायंकाळीं तो पाहावा
स्फूर्तीही होते रचावीं कवनें त्यावरी—झोंपाळ्यावरी !

वारा कैसा लागे छान–
हरपलें सारें भान–
सारीं दुःखें उडुनी गेलीं तीं वाऱ्यावरी ! झोंपाळ्यावरी !

---

रत्नागिरी.
२८–३–३५.

प्रकाशन :
मुलांचें मासिक, नागपूर.
सप्टेंबर १९३५.

कळी पांचवी–

## मेघ !

सकलजनहितातें मेघ पर्जन्य देतो,
स्वतनु चिरुनि मार्गे रक्त सांडीत जातो !
जनहित करण्याची केवढी आस पोटीं–
खचित खचित पुण्या पाडितो मेघ गांठीं !

---

रत्नागिरी.
१९३१

प्रकाशन :
विहंगम, नागपूर.
जुलै १९३५.

कळी सहावी–

# फांसावरला देशभक्त !

एका देशभक्ताच्या आयुष्यांतले दोन प्रसंग. कथा काल्पनिक आहे. इंग्रजींतल्या The Patriot या कवितेशीं कांहीं कल्पनांचें साम्य आहे ! जितजेत्यांचा संबंध दाखविणारी याच नांवाची दुसरी कविता 'प्रकाश' या आगामी काव्यग्रंथात येईल.

( जाति–वसंत. )

अहारे ईश्वरा ! हे कां श्रमाचें माझिया चीज ?
याच देशा-जनां-साठीं किती मी सोशिली झीज !

× × ×

सुखाची सोडुनी आशा घराचा त्याग मी केला !
त्यजोनी पाश प्रेमाचा मुलांबाळांस पत्नीला–
माझिया मायभूसाठीं प्रमोदें घेतली फकिरी !
घेउनी प्राण हातांत भटकलों सर्व देशभरी !
कितीं तीं संकटें आलीं माझिया रोखुनी प्राणा !
न ढळलों एक रेंस परी असा माझा असे बाणा !
किती दिन राहिलों दडुनी, दऱ्याखोऱ्यांतुनी खोल
अन्नपाण्याविना कितिक कंठिले दिवस बिनमोल !
किती कारागृहीं क्लेश, सक्त तें कामही करुनी–
किती मीं काढिलीं वर्षे अंदमानीं मनीं झुरुनी !
अन् जधीं एकदां आलों सुटोनी यातनांतून
तईं मम स्वागतासाठीं मार्ग गेले अहा फुलुन !

गुढ्या नी तोरणें उठलीं पताका फडफडूं लागे
'फुलांचा गालिचा पसरा पथीं;' ऐसें कुणी सांगे
अत्तरें मार्ग शिंपडुनी फुलांचा पेर पसरीती !
घरें खालीं वरीं फुललीं माझिया स्वागतासाठीं !
तयांचें पाहुनी प्रेम मलाही मोद बहु झाला
गळाले टप्‌टपां अश्रू कंठ दाटूनियां आला !
"लोकहो आज यश आलें आपणां नाहिं तरि पूर्ण—
अजूनी व्हायचें आहे किती अन्याय-छळ-चूर्ण !
आपणां लाभली सत्ता जाहलें कार्य अर्धें हें
समाजाची घडी नीट अतां साधायची आहे."
एवढें बोललों कष्टें फुटेना शब्द यापुढतीं
परी कळलें समाजाला पहा ! टाळया कशा झडती !

\+ \+ \+

अरे, हें स्वप्न का आहे, कीं असें जागृतीमाजीं ?
खरोखर यापरी नीच दशा व्हावीच का माझी !
मागल्या स्वागताऐशी आजही लोटली गर्दी !
'चला या—या पहायाला' अशी जो तो वदे वर्दी !
लोक आले पहायाला घरांच्या छप्परांवरुनी
मान बाहेर खुपसीती पहा खिडकींतुनी कोणी !
मंददृक् ठेंचळत आले, लंगडे अडखळत येती,
स्त्रिया घेऊनियां स्कंधीं मुलांना, वा कडेवरतीं !

घातल्या माझिया हातीं बिडया या दोन मण वजनी
लाल झाला असे मार्ग रक्त देहांतुनी गळुनी !
मुलें हीं एक ना दोन फेंकताती खडे मातें !
कराया हें तयां सारें कुणीसें शिक्षिलें होतें !
कुणी तो चारगट पोरें थुंकती दांत काढोनी
तयांचे बाप नी बंधू हांसती वाहवा म्हणुनी !
असें कां जाहलें? सांगूं? कशाला साङ्‌गण्यास हवें?
मिळे स्वातंत्र्य जैं देशा उपजले ‘ देशभक्त ’ नवे !
कदा त्या संकटांकाळीं कुणी नाहीं पुढें येत !
संकटें मात्र तीं टळतां पहा जो तो पुढें होत !
तयांना वाटतें, ‘ सारें कार्य केलें अम्ही मिळुनी;
कशाला याचिया नांवें लोक गाती यशोगाणीं ? ’
म्हणूनी सांगती लोकां ‘ असें मी हेर शत्रूचा
अणी माझा विचार असे धर्म तो भ्रष्टवायाचा ! ’
लोक ते ! त्यां कळे काय ? चकाके तेंच तें हेम !
बिथरले सर्व एकसरें धरावा कुणि कुणा नेम !
मानुनी हेर शत्रूचा, मानुनी धर्मभ्रष्ट मला
माझिया देशबंधूनीं मला फांसास चालविला !
नमो हे देशबंधूनो, नमो हे मायभू ! जननी !
तुम्हांसाठीं–तुझ्यासाठीं–जन्मलों, जातसें मरुनी !

इंदूर.
१३–८–१९३५.

कळी सातवी–

# ही कोण ?

ही कोण ? सांग मजला–जी स्फूर्ति देत नित्य !
अवलोकितां मुखाला–आनंद होत सत्य !
जइं खिन्न होतसें मी–तइं मंद मंद येत,
मृदु हस्त स्कंधिं ठेवी–खुदकन् हंसे मुखांत !
निज हस्त देउनीयां–माझ्या करांत बैसे
मधु भाषणें करोनी–हंसवी–स्वयेंहि हांसे !
होई जई निराश–तइं येत हास्यवदनें
लडिवाळता तियेची–नैराश्यता लया ने !
मम घाबऱ्या जिवाला–आधार तीच एक
तिजवीण जीवनाला–जणुं येतसे कलंक !
मित्रा ! जरी तुला ती–येते न ओळखाया
आशा म्हणें तिला मी–**तिजवीण सर्व वाया !**

---

पुणें. प्रकाशन :
८-७-१९३५. किर्लोस्कर–मे १९३५.

---

## चहापान–निषेध

**व्यायामः**–( बडोदें ) या विषयावर हा सुसंगत, सविस्तर आणि शास्त्रीय चर्चा करणारा ग्रंथ प्रसिद्ध करून रा. शेंबेकर यांनीं मराठी वाचकांवर फार उपकार केले आहेत. प्रत्येक माणसानें हें पुस्तक एकदां अवश्य वाचावें.

**कळी आठवी–**

# पोरका !

'आईबापाविना भिकारी' झालेल्या पोराचे हाल कुत्रा तरी खाईल काय ?

( जाति–**पांडव दिडकी** )

काय मी अन्याय केला? देवराया सांग ना,
 कां अशा या यातना?
प्रेमळा ती माय माझी अंतरे मजलागुनी,
 नेलि कां तूं चोरुनी?
हाय! माझ्या जीवनाचा सर्व ठेवा संपला
 शोधुं कोठें मी तिला ?
धुंडिलें घरदार सारें, कोंपरा अन् कोंपरा
 सांपडेना मम हिरा !
मारिल्या हांका पहा हा कंठ गेला शोषुनी
 पाणि ये नेत्रांतुनी !
देइना 'ओ' कोणि हांके– जीव झाला घाबरा,
 ना कुणाचा आसरा !
तात यापूर्वींच गेले देवबाप्पाच्या घरीं
 लोटुनी मजला दुरीं !
एक वर्षापूर्वींचा तो हाच दिन होता पहा
 वाजले होते दहा;—

त्या तशा अंधाररात्रीं किरकिरत होते किडे
घू करीतीं घूबडें !
आपुलें आटोपुनीयां काम बाबा ये घरीं
चढत दारीं पायरी;
तोंच हृदयीं येत झटका— प्राण तो सोडी कुडी
आइ शोकीं घे बुडी !
माझिया भोळ्या मनाला मर्म न कळे यांतलें
मन्मनाला वाटलें
'लागुनीयां ठेंच पडले तात, घेरी येत ती !
फारशी नाहीं भिती'
जाउनीयां जवळि वदलों—'तातहो, आतां उठा !
टाळिं देवा संकटा !'
तात उठले नाहिं कधिंही हालले, ना बोलले
हृदय माझें चरकलें !
मोकळ्या कंठें रडाया लागतों आई नि मी,
वाहल्या गंगी—यमी !

\+ + +

त्या दिनापासूनि आई तुटत गेली तिळतिळ—
आज त्या आलें फळ

आजच्या या काळिं कोणी मजसवें रडण्यास न-
वा कराया सान्त्वन !
आइबाबा जात स्वर्गी मीच कां धरणीवरी
ने प्रभो मजला वरी !
तूं अनाथां नाथ--मग मी वाट पाहूं कुठवरी ?
धांव आतां श्रीहरी !

पुणें--रत्नागिरी.
२२-९-३४
८-११-३४

## कळी नववी–

# आपला भारत !

( जाति–मोहिनी. )

जन्म पूर्वपुण्यें जेथें आमुचा जहाला
कसें अम्ही तुज विसरावें भारता विशाला ? ध्रु०

--१–

रामचंद्र जन्मा आले याच भारतांत
ईश घेइ अवतारांना याच पुण्यभूत
थोर थोर मुनिवर गेले होउनी इथेंच
शूरधीर नरवीरांचा देश सत्य हाच
कां न पुण्यभूमी ऐशी योग्य गौरवाला ?

–२–

सर्वश्रेष्ठ हिंदूधर्मस्थान भारतांत
ग्रंथराज भगवद्गीता याच मायभूत
नगश्रेष्ठ हिमगिरी नांवें याच पुण्यभूत
सरित्श्रेष्ठ गंगा वाहे याच हिंदूभूत
कशी भूषणावह नाहीं मायभू अम्हांला ?

–३–

पूर्वकाळिं काञ्चनभूमी म्हणत हिंदभूला
खरोखरीं पारचि नव्हता तिचे वैभवाला

परी दैव फिरलें—गेलें सर्वही सुवर्ण
पारतंत्र्य येउनि पडली बंधनांत पूर्ण
परी मायभूमी अमुची प्रिय असे अम्हाला !

—४—

बालकास मातेहूनी प्रिय नसेचि कांहीं
माय दूर झाली असतां दुःख फार होई
हिंददेवि माता अमुची बंधनांत नांदे
बाल तिचे आम्ही कसे रहावे प्रमोदें
माय प्रेमळा ती अमुची पाहिजे अम्हांला !

—५—

चला काळ आणूं आतां सुवर्णासमान
जगा दाखवूं जळजळता स्वदेशाभिमान
शृंखला तटातट तुटती तेज दशदिशांना
असें दृश्य केव्हां पाहूं प्रश्न हा तुम्हांला
देशभक्त होउनि अर्पूं तनुमनाधनाला !

•

जन्म पूर्वपुण्यें जेथें आमुचा जहाला
कसें अम्ही तुज विसरावें भारता विशाला ?

---

रत्नागिरी
१९३२

प्रकाशन :
मुलांचें मासिक, नागपूर.
नोव्हेंबर १९३३.

कळी दहावी–

## पाऊस !

( आनंदी आनंद गडे. )

वारा ये सोसाट्याचा कहर उडवितो प्रलयाचा !
तों पर्जन्या ये लहर मुसळधार आली जोर !
घर वाटे जातें उडुनी कीं पृथ्वी जाते बुडुनी !
तोफ गडगडे जोराची धूम्राची होई गची !
वृक्ष जोरजोरें हाले पिंपळवड डौलें डोले !
झांकी रवी अपुले डोळे कऊल छपराचें बोले !
पाय फुटति ओहोळांना भेट द्यावया सरितांना
बाळ कौतुकानें पाहे 'चहा' नदी भरुनी वाहे !

\+ + +

आहे कीं सांगा नाहीं पर्जन्याची गंमत ही ?

---

रत्नागिरी
१९२२

प्रकाशन:
बालबोध, पुणें

---

कळी अकरावी–

# आवडतीं गाणीं !

Our sweetest songs are those
That tell of saddest thought !

—**P. B. Sheley.**
[ To a Skylark. ]

–१–

आवडतीं गाणीं–
आमुचीं प्रियकर तीं गाणीं–
सदासर्वदा दुःखीकष्टी जीं इथुनि तिथुनी !

–२–

दुःखद होती रे–
पसारे जगतींचे सारे–
दुःख धुपाया दुःखाचा हा विचार बरवा रे !

–३–

नच आपण एक–
जगीं या दुःखी बहु लोक !
मनास कळतां विचार ऐसा सोडिल तें शोक !

—४—

उष्णें उष्ण मरे—
तैसें दुःखें दुःख सरे—
दुःखपूर ओसरे देह हा चैतन्येंच भरे !

—५—

म्हणूनी आवडिचीं—
अम्हाला गाणीं दुःखाचीं—
हीं स्मशानगाणीं गाऊं आम्ही बहु आनंदाचीं !

---

पुणें.
३१–१२–३४.

प्रकाशन :
मतिविकास, पुणें.

---

**कळी बारावी—**

# ओढ्याचा उपदेश !

पर्जन्यकाळीं जरा इकडे तिकडे फेरफटका केल्यास किती तरी ओढे वाहतांना दृष्टीस पडतील ! वरवर दृष्टीनें पाहिल्यास खळखळ आवाज तेवढा आपल्या कानीं येईल ; पण खोल व अभ्यासू दृष्टीनें त्यांची पहाणी केल्यास खालील **कर्तव्य-गीत** गाऊन निराश मानवाला ते चैतन्यगुटिकेचे वळसे देत असतात असें प्रत्ययास येईल.

[ जाति—चंद्रकान्त.]

एके दिवशीं ओढ्याकाठीं सहज बैसलों मी
ईश्वरनिर्मित निसर्गशोभा पहात तीं नामी !
चमत्कार तो असा जाहला—तो निर्झर बोले
' भल्या गृहस्था ! ऐक मम कथा लावुनियां डोळे !

गिरिकुहरामधिं जन्मुनि धैर्ये येथें मी आलों
येथुनिहि पुढें मोक्षपदाला जाण्यास निघालों !
परमेशानें मला धाडिलें अफाट या जगतीं
काहिं तरी कर्तव्य दिलेलें आहे मम हातीं !

जरी असें मी लहान—देवें कर्म दिलें मजला
कर्तव्याचें कंकण बांधुनी वीर पहा सजला !

थोर थोर नद वाहुनि पाणी लोकां सुखवीती
तया नदांना साह्य कराया अवतरलों जगतीं !

देह झिजवुनी मार्गें माझा लोकहितासाठीं
प्रेमें जातों थोर नदांना देण्याला भेटी !
या मार्गानें जातां जातां मोक्षाला जातों
थोर नदांचे संगें सागरतीर्था आक्रमितों !

इहलोकांमधिं या मार्गानें मोक्ष मला मिळतो
कर्तव्य-मुशीमधें तावुनि पूर्ण शुद्ध होतों !
मोक्ष मिळविण्या गिरिकुहरामधिं लपुन नको बसणें
कर्तव्याचें कंकण बांधुनि हातिं पुढें जाणें '

× × ×

ऐकुनि ऐशा निर्झरमुखिंच्या अमोल उपदेशा
प्रकाश पडला लख्ख चहुंकडे कर्तव्यप्रदेशा !
त्या तेजानें माझीं मजला कर्तव्यें दिसलीं
जीं होतीं अज्ञानतमामधिं पूर्णपणें दडलीं !

---

रत्नागिरी
१९३१

प्रकाशन :
**चैतन्य, पुणें.**

कळी तेरावी-

# घर !

( सुनीत. शा. वि. )

देवानें दिधली असेल जर का मोठी अशी देणगी
जेव्हां धाडित जीव भूमिवरतीं तेथें निवासावया
जाणा ती 'घर' याच बिंदुभंवतीं सारेच गोळावती
बोलो कोणि किती–परंतु धजली कोणी न निंदावया

पोटासाठिं कुणी कुठेंहि भटको, ध्यातो मनीं स्वगृहा–
विद्येसाठिं कुणी कुठेंहि फिरको–चिंती स्वधामा मनीं
लक्ष्मी आणि सरस्वती मिळवुनी राहो प्रदेशान्तारीं
'देवा मद्‌गृहिं देह हा तरि पडो' प्रार्थीत रात्रंदिनीं

तो आहे तिकडे सुभव्य सुतराम् रंगीतसा बंगला
ही आहे इकडे चिमूट चिमणी अन् तृणमयी झोंपडी
मानी झोंपडि राजमंदिर जणूं तो झोंपडीचा धनी
प्रासादासम बंगला–नच तिथें त्या ती 'घराची घडी'

देवें बांधियलें–अम्हांस दिधलें देऊळ, राऊळ हें
त्या देवासम पूजनीय अमुचीं नाहींत कां हीं गृहें ?

---

रत्नागिरी
१-४-१९३५

प्रकाशन :
पुरुषार्थ, औंध
ऑगस्ट १९३५

## कळी चौदावी–

# हें संक्रमण !!!

संक्रान्तीच्या पवित्र दिवशीं तरी आपण आयुष्याच्या अनिश्चित प्रवाहांत काय संक्रमण केलें आहे याचा आढावा प्रत्येकानें काढावा. विवेकबुद्धीची किल्ली पिळून तिला थोडी चालना द्यावी; व आपली मिळकत कोणत्या पारड्यांत बसते व पुढील काळांत बसावयास पाहिजे तें पहावें.

–१–

कशाचें संक्रमण करितां? कशाला ऐट ही सारी?
बुडाला देश हा अपुला हलाखी ठाकली दारीं !

–२–

रंगबेरंग हलव्याचे तसे नवढंगवैचित्र्य !
कुणाचा कोणि नायंता असे हें व्यक्तिस्वातंत्र्य !

–३–

स्वदेशिचि ना कुणा चाड असे हें विश्वबंधुत्व !
कुणालाही पुसा कोणी तयाचें हेंच शिष्टत्व !

–४–

मनाचें काय हें दास्य चहाचा ना सुटे प्याला !
जरी तो घातकी आहे तरी तो इष्ट आम्हांला !

—५—

'तुम्ही आम्ही सकल बंधू' असें तोण्डें समाज वदे
परी अस्पृष्ट तो येतां, तयाची सावली बाधे !

—६—

"तीळ घ्या, गूळ घ्या तुम्ही" वदूं "बोला सदा गोड"
परी परघात करण्याचे अम्हाला सारखें वेड !

—७—

कुणाची उन्नती झाली—अम्हाला नाहिं खपणार !
जाहला आत्मघात तरी तयाला चीत करणार !

—८—

न कोणी संक्रमण करित होत हें सत्य आक्रमण
कधीं त्यजणार ही रीत ? प्रश्न तुम्हां करी 'किरण' !

---

रत्नागिरी
९–२–१९३४

प्रकाशनः
सत्यशोधक, रत्नागिरी.

---

कळी पंधरावी–

# आनंदाचें उद्यान !

–१–

जेथें दुःखा जागा न आनंदाचें उद्यान !
जग हें आहे खरोखरी मग कां होता दुःखि तरी !

जगदीशें–
परमेशें–
सर्वेशें–

सर्वां जीवां धाडियलें उद्यानीं या सोडियलें !

–२–

सोडुनिया उद्यानांत देव बसोनी स्वर्गांत
पाही लीला जीवांच्या आनंदोद्यानांतिल या !

कोण हंसे
कोण रुसे
कोण दिसे–

दुःखी; कोण सुखी दिसती ! सदा सर्वदा या जगतीं !

–३–

मधुकर उद्यानीं दिसती ! मंजुरवें मधु चाखीती !
मधमाशा आनंदानें मधु मिळवीती यत्नानें !

गुणगुणती

गातातीं

फिरतातीं

उद्यानीं इकडे तिकडे—दुःख न त्यांच्या दृष्टि पडे !

—४—

जगताच्या उद्यानांत मानव बहु भाग्यवंत !

परमेशानें मनुजाला बहु मोठा ठेवा दिधला !

कां मग हा

मनुज पहा

दुःखि महा ?

जगताच्या या उद्यानीं सुखी रहावें सर्वांनीं !

—५—

अलि आनंदें बागडती ! मानव कां दुःखें रडती ?

मधमाशा गाणें गाती मानव कां दुःखी होती ?

मनुजानें

दुःखानें

कष्टानें

कां कंठावे दिवसांना ? सुखवांटा नच का त्यांना ?

---

रत्नागिरी.
१९३२

प्रकाशन:
मतिविकास.
डिसेंबर १९३३.

कळी सोळावी–

# मोतीं !

( जाति––भूपतिवैभव. )

हें काय ? अशीं उधळलीं कुणी हीं मोतीं ?
आतांच कोठुनी आलीं ? आधीं नव्हतीं !
हा शेणकटाचा कचरा कुचकीं पानें
फेकुनी द्यायचीं अशांत का तरि त्यानें ?

तरि दैव ! गालिचा तयां मिळाला हिरवा !
अन् तोही उञ्चावरी पसरला बरवा !
पाणिदार मोठीं तशीं टपोरीं गोल !
वाटेल हिऱ्यांचें तेज यांपुढें फोल !

हीं गोळा करुनी न्यावीं '**तिज**' अर्पाया
करुनिया बेत लागला वेंचवेंचाया !
तों हाय ! लागला ढका जरा अन् काय ?
कोठोनी न कळे भिजले त्याचे पाय !

\+ + +

मग तया कळे फेंकिली न मोतीं कोणी !
तें होतें साधें **आळवावरचें पाणी !!**

---

इंदूर ( मध्य हिंदुस्थान )
११–८–१९३५

प्रकाशनः
**विश्ववाणी**, नागपूर
सप्टेंबर १९३५.

त्या पवित्र गोमातेला—यवन ते चराचर चिरिती
वधितां धेनूला सदया
मनिं त्यांच्या येई न दया
गेला विवेक तो विलया
गोमातेला रक्षाया—अवतरे शिवाजीराया !

—४—

विश्वाचा पालक देव—देवळांत मूर्ति तयाची !
जगताचा चालक देव—हिन्दु पूजिती त्यालाची !
भक्ताला भक्तीसाठीं—सगुणमूर्ति ही देवाची !
यवनांचा आला घाला
मूर्तींचा भंगचि झाला
देवाशीं दावा केला
देवदेवळां रक्षाया—अवतरे शिवाजीराया !

—५—

मातले यवन ते फार—दो बोटें स्वर्गाचि उरला
हिन्दूंना छळण्याचा कीं—अल्लानें हक्कचि दिधला !
हिन्दूंची अब्रू घेणें—हें न्याय मुसलमानाला !
हें खपलें नच देवाला
पापाचा घट तो भरला
हिन्दूंना वाली नुरला !
हिन्दूंस सर्व रक्षाया—अवतरे शिवाजीराया !

—६—

कामान्ध जाहले यवन—डोळयांवरि धुंदी आली
हिन्दू स्त्रियांस बाटविती—त्यां कोणी नुरला वाली
अबलांची अब्रू घेती—बुद्धीस भ्रष्टता आली !
सत्तामद आंगीं चढला
भय नुरलें छळ करण्याला
नच खपलें हें देवाला !
अबला—अब्रू रक्षाया—अवतरे शिवाजीराया !

—७—

छळ होत चालला फार—जाहले लोक बेजार !
परि संकटसमयीं ऐशा—कितिक ते झोंपले घोर
देशद्रोही ते कितिक—यवनांचे झाले हेर !
झापल्यास त्या उठवाया
जागत्यांचा नेता व्हाया
द्रोह्यांचा नाश कराया
स्वातंत्र्यमार्ग दावाया—अवतरे शिवाजीराया !

---

रत्नागिरी
१९३२

प्रकाशन :
पुरुषार्थ—औंध. श्रीशिवाजीविशेषांक.
एप्रिल १९३३.

कळी विसावी–

# कां बरें ?

[ जाति––गोकुळिंचा कान्हा. ]

–१–

जगताची रीत अशी ही असावीच कां बरें ?
सृष्टीचा धर्म असा हा दिसावाचि कां बरें ?
या साऱ्या गोड्या सरिता
धांव घेति जलधीकरितां
सागर तो खारा मग हा–प्रेमभाव कां बरें ?

–२–

कमल किती सुंदर असतें
मोह पाडि सर्व जनांतें
परी घाण चिखलामध्यें जन्म घेइ कां बरें ?

–३–

तारका चकाके पाहीं
हिऱ्यापरी तेज तिचेंही
परी तिला अंधाराची आवडीच कां बरें ?

—४—

पिता असे थोर महात्मा
पुत्र होत दुष्ट दुरात्मा
हिऱ्यापोटिं जन्मा येई—गारगोटि कां बरें ?

—५—

चंद्र धवलतेचा पुतळा
जणूं तो हिमाचा गोळा
परी त्यावरी ते काळे डाग सांग कां बरें ?

—६—

पुष्प गुलाबाचें रम्य
गोड तसें मुग्ध, सुरम्य
परी चुंबिती त्या कांटे असा न्याय कां बरें ?

—७—

गंध चहुं दिशा दरवळतो
मानसास आल्हादवितो
चंदनास ऐशा बिलगे दुष्ट नाग कां बरें ?

—८—

इश देत जन्म नराला
नेई ताच ओढुनि त्याला
दिलें दान दुसरे हातें परत घेइ कां बरें ?

—९—

धनिक धना उधळीताती
गरिब ते उपाशी मरती
देवाच्या सदनीं ऐशी विषमताचि कां बरें ?

—१०—

चणे तिथें नसती दांत
दांत तिथें ते नसतात
विफळता अशी या जगतीं घडे सांग कां बरें ?

पुणें.
४–१२–१९३४

कळी एकविसावी-

# चंदनाचे बोल !

[ जगा तुझी सारी रीत— ]

ऐक ऐक तरी आतां देउनीयां कान !
अंगीं येण्याला सुवास
मोल येण्याला देहास
साहीयेला वनवास
केलें जधीं ऐसें तप–मिळाला हा मान !
हत्ती-वाघ-सिंहादीक
चित्ते, अस्वलें कितीक
नाग तैसे ते आणीक
क्रूर श्वापदानीं फुल्ल–असें वनमान !
शुंडादंडें तडाखून
मोडे फांदी कडाडून
आलिंगीतीही प्रेमून
नाग–त्यांचा राग लोभ मानीला समान !
झुळझुळीत कधीं वारा
कधीं पर्जन्याच्या धारा
थंडी ऊनाचा पसारा
केंव्हां गारांचा पाऊस–केंव्हां तें तुफान ! !

आला कोणी मोळीवाला
हातीं धरुनी कुऱ्हाडीला
( **दधीचीचें** भाग्य मला )
याचा आशय जाणून–सोडीयेला प्राण !
झाले देहाचे तुकडे
**दधीचीचीं** जणूं हाडें
साणेवरी झिजती खोडें
देवासाठीं, जनांसाठीं सार्थ हो जीवन !

\+ \+ \+

झिजेविना नाहीं चीज
घेऊं नको ऐशी नीज
तळपुं दे मनीं वीज
देवजनांसाठीं झीज–चंदनासमान !

---

इंदूर
१९–८–३५

कळी बाविसावी–

# भारतपुत्राची प्रणयपत्रिका !

सध्यां काव्यांत प्रणयपत्रिकांचा फार सुळसुळाट आहे.
त्यांत रसिकांनीं ही एक सामील करून घ्यावी.

[ शंभर ओळींचें लघु खंडकाव्य. ]

[ जाति—चंद्रकान्त. ]

एके दिवशीं हिंडत होतों एकटा असाच
संध्येचा तो समय खेळकर पवनाचा नाच !
प्रभातनगरी सायंकाळीं सौंदर्ये खुलती
सहल कराया पुण्यपुरीच्या युवयुवती जाती !
मचि कसा अपवाद ? चाललों सहल करायाला
तोंच एक पाहिलें दृश्य — अन् विचार मनिं आला !

\+ \+ \+

एक जोडप युवयुवतीचें गुजगोष्टी करित–
लोक काय म्हणतील ? तयांना मुळिं नाहीं खंत !
रस्त्यापासुनि आंत जरा तीं माळावर बसलीं
परस्परांच्या वदना पाहुनि गालामधिं हंसलीं
मावळतीचे अनुरागानें गाल लाल होती
ओंवाळिल पंचारति भास्कर जईं भेट देती
तैसे अमुचे या युवतीचे गुलाब फुललेले
कुंदकळ्यांची जोड तयांना दोन नील कमळें

या उद्यानीं अदृश्य ठेलें मानसकासार
राजहंस हृदयाचा त्यामधिं करणार विहार
नंदनवन हें ! या बागेचा धन्य धन्य माळी
सात्विक सुख स्वर्गीय सेवितो ऐशा कलिकाळीं
–नको नको तूं पाहूं इकडे–टवाळ हे लोक
' लक्ष न देणें ' उपाय यावरि हाच रोखठोक
परनिंदेतें करावया हे टपलेले टोळ
भीक नको तूं घालूं यांना—असाच हा काळ !

+ + +

तें पाहोनी गोड जोडपें–विचार मनिं आला
असाच यावा काळ कधीं तरि अपुल्या वांट्याला !
माळावरच्या मातीवरी मजेंत मिरवावें
मावळतीच्या अनुरागाला अवलोकित जावें
नेत्रांना संतोषहि द्यावा–( जे उत्सुकलेले )
दाखवुनी त्यां कुंदकळ्या नी गुलाब फुललेले
हा हा माळी घेऊनि झारी उभा सिंचनाला
परि कोठें ती बाग ? कुठें तें नंदनवन बोला ?

+ + +

त्या बागेच्या शोधासाठीं हिंडहिंड हिंडे
तुडवित पायीं दऱ्या नि खोरीं–कांटे आणि खडे
तुडुंब भरली नदी, तसा तो खडखडीत ओढा
नंदनवनशोधार्थ फोंकिला फेंसाळत घोडा !

नंदनवन तें पृथ्वीवरती सांपडण्या कठिण
अप्रतीम अन् अमोल आहे–साधारण तें न !

× × ×

नंदनवनिं त्या नांदत आहे सुंदर एक परी
प्रेमाची ही तिला ऐकुंदे माझी ललकारी
उद्यानीं ती असेल बसली प्राजक्ताखालीं
पारिजात–सुमनांची वरुनी वृष्टी होत भली
किरण चोरटा रविचा कोणी गालीं विहरेल
गालावरची लाली अनुपम तिची वाढवील
पोपट चिमण्या तशीं कबुतरें आणि कोकिळा ती
मधुर बोलती--तीं चिवचिवती अन् गाणें गाती !
अनतिदूर तिजपासुनि आहे वापी स्फटिकाची
अनेक तीमधिं कमळें फुललीं गर्दी भृंगांची !
भृंगांच्या त्या गुंजनगीता जोड कोकिळेची
जिकडेतिकडे प्रभा पसरलेली आनंदाची !
इतर जगींच्या कन्यकांपरी नाहीं ती बाला !
(जगतींची कन्यका साहजिक कंठिं घालि माळा !)

× × ×

कोण? कोण ही विचित्र बाला? नांव काय तीचें?
प्रश्नावरतीं प्रश्न असे हे अवखळ लोकांचे !
ऐका–ऐका–कान लावुनी नांव तिचें ऐका–
'**स्वतंत्रतादेवी**' तिज म्हणती–सर्वत्रहि डंका !

भारतवर्षी नांदत होती पूर्वीच्या काळीं–
अब्रूवरतीं प्रसंग येतां– येथुनी पळाली !
रामचंद्र श्रीकृष्णादिक त्या दैविक लोकांची–
धर्मभीम अन् अर्जुनादिकां शूरावीरांची
शिवरायादिक स्वातंत्र्याच्या खड्या शाहिरांची–
रामदास आदिक सुविरागी भारतसंतांची,
लोकमान्य टिळकांची, तैशी महात्मादिकांची–
असे असे ही मानसकन्या गुणांस्वरूपाची !
स्वतंत्रते ! सुंदरी ! तुझ्यावर मन जडुनी गेलें !
समजत होतें तेव्हांपासुनि प्रेम असे केलें !
सांग सांग तूं मानस माझें चोरुनि कां नेलें ?
कासारांतिल जला शोषुनी मीना ठेवियलें !
वणवण भटके, जीव भुकेला तुझिया प्रेमाला !
सांग सांग ना करूं कोणत्या अवघड दिव्याला ?
रुसुनी ऐशी एकटीच तूं तरूतळीं बसशी–
विचार कसला करिशी? बोलत नाहीं माझ्याशीं !
रुसवा ऐसा काय धरावा प्रियकर येतांना ?
एकाद्याच्या मना मोहुनी मुकें बसावें ना ?
घडला का अपराध कोणता माझे हातोनी ?
बोलशी न तर जाइल माझें हृदय विदारूनी !

उशीर केला यावयास मी ऐसें का म्हणसी ?
कीं न घेतली तुझी काळजी-- खुपे अंतरासी ?
तुजवरि येतां बहुत संकटें धांवुन आलों न
हीच गोष्ट का वाढवि तुझिया रागाचें मान ?
का वाटे–मी दुजा कुणा अर्पिलें मन:सुमन ?
आळशापरी का मी बसलों घरांत झोंपून ?
नाहिं गडे ! या अशा संशयां देइं मूठमाती !
हां ! हंस ऐशी ! कुंदकळ्यांची चमकूं दे पंक्ती !
माझ्याकडुनि विलंब झाला तुझिया भेटीला
परी, प्राण मी पणा लावुनी पाठिराख केला !
ध्यास घेतला तुझा मनानें पाश सर्व त्यजिले !
श्रीमंतीच्या तशा सुखाच्या लाडां लाथडिलें !
सांग अतां मी तुला मानिनी आवडतों कीं न ?
हांस ! हांस एकदां ! पाहूं दे हंसरें हें वदन !!

\+ + +

हातांमध्यें हात घालुनी चल जाऊं आतां
वनवास पुरे असा चल चमत्कार दावूं जगता !
तुझी आणखी माझी जोडी वर हा देवाचा !
परि परमेशें भार घातला बहु कर्तव्याचा !
सुखोपभोगा, चैनीसाठीं अपुली गट्टी न
मातृभूमिदैन्या धुपवाया अपुलें आगमन !

मनीं वसूं दे आपण आहों वंशज शूरांचे
दिन नसती हे गादीवरतीं लोळत पडण्याचे !!
स्वतंत्रते ! मी तुझा दास अन् तूं माझी दासी !
स्वतंत्रतासंदेश वाचुनी दावूं जगतासी
संध्याकाळीं माळावरच्या मातीवर बैसूं
स्वागत करुनी स्वबांधवांचें पोटभरी हांसू !!

---

पुणें १२।१२ १९३५

## कळी तेविसावी–

# वाग्बाण—

वाग्बाण सोडणें फार सोपें असतें
परंतु त्याचे परिणाम मात्र फार
भयंकर होतात.

( जाति–नृपममता.

सोडसी असे हे बाण
परी दुःखी होतो कोण ?—पाहिं ना !
वाग्बाण तुझे नरवीरा
दुखवाया दुसऱ्या जिवा—असतिं का ?
वर सरस्वतीनें दिधला
का शिकार साधायाला ?—सांग ना !
ही वाणी–भरते पाणी
योजिसी तिला कटु वचनीं—कां बरें ?
माधुर्य मुखींचें मोठें
कां ऐशा कर्मी फुकटें—दवडसी ?
जरि शिकार तव हौसेची,
करिं तरी व्याघ्रसिंहांची—सर्वदा !
हे ससे आणि हरणें तीं,
नाहींत शिकारीसाठीं—निर्मिलीं !

हीं बाळें गोजिरवाणीं,
मित्रत्वानें मनुजांनीं—रक्षिणें !

लीलेनें सोडी बाण
पारधी लक्ष्य रोखून—सर्वदा !

घायाळ होत प्रतिपक्षी,
परि कोण तयातें लक्षी—प्रीतिनें !

सौकर्ये सुटतो बाण
परि तो वर्मीं लागून—दुखवितो !

पारध्यास नसते चिंता,
या इकडे ऐशीच चिंता—भडकते !

पारधी हत्यारी बरवा
करुं नका तयाची परवा—कोणिही !

जाहल्यास व्रण देहास
होईल बरा तो खास—कधिं तरी !

प्राणांतिक होतां जखम
तो म्हणेल प्राणी 'राम'—एकदां !

परि याहुन दुसरी गोष्ट,
देणार कधीं ना कष्ट—अंतरा !

पारधी दुजा तो न भला,
वाणीचें शस्त्र जयाला—चेतवी !

वाग्बाण तीव्रतम होती,
हृदयांत जाउनी घुसती—सर्वही !
हृदयाहुनि दुसरें स्थान,
वाग्बाणां आवडतें न—सर्वदा !
जखम खोल होते हृदयीं,
दुःखाला ठावच नाहीं —समजलां ?
मांसाच्या छेदावीण,
रक्ताच्या स्त्रावावीण— जखम ही !
बाहेरिल दृश्यावीण,
शारीरिक कष्टावीन—जखम ही !
जखम ही सदाची ओली,
जरि नाहीं ऐशी दिसली—डोळसां !
शस्त्रवैद्य नाहीं कोणी,
जो देई जखम शिवोनी—हृदयिंची !
मलमही नाहिं कसलेंही,
मात्राही एकहि नाहीं—अचुकशी !
धन्वंतरि कोणी आणा,
तो ठरतो येथ दिवाणा—बापडा !
चरक वाग्भटाचे बोल,
ठरताती येथें फोल—सर्वही !

कळी पंचविसावी.

# ध्येय !

( आनंदकंद )

घेवोनियां प्रचीती—हें ध्येय ठेव चित्तीं ! ध्रु०
होऊं नको उदास—धीर आत्मविशवास !
पाऊल टाक पुढतीं—हें ध्येय ठेव चित्तीं !
" मी क्षुद्र " भावना ही—सोडोनि दे कशीही
" मी क्षुद्र नाहिं जगतीं "—हें ध्येय ठेव चित्तीं !
" आत्मोन्नती करीन—देशोन्नती करीन
मी सत्य त्याचसाठीं "—हें ध्येय ठेव चित्तीं !
घेवोनियां प्रचीती—हें ध्येय ठेव चित्तीं ! !

रत्नागिरी
१९३२

---

कळी सव्विसावी.

# एकजीव !

( जाति—मोहिनी )

एकजीव दो जीवांचा होत या घडीला !
मोकळा करा वाद्यांनो कंठ आपुलाला ! ध्रु०
दोन कुळींचे हे दोन भिन्नभिन्न जीव
होति आज हृद्भावानें पहा एकजीव !
मंगलाष्टकें गाऊनी टाकिं अक्षतेला !

—२ -

प्रेमभाव हृत्सागरिंचा उतूं लागताहे
जीव तय ।हृद्चांदाची वाट पाहताहे
पटल दूर सारोनीयां—दाखवा तयाला !

—३—

जन्म सफल करण्यासाठीं दिला जन्म देवें;
धरेवरी येवोनी कर्तव्य तें करावें !
कशी एकहातें टाळी वाजणार बोला ?

—४—

कुणीं म्हणे लग्नाची ही बेडि होय सत्य
कुणीं म्हणे हृदयीं स्त्रीचे कपटवास नित्य
ईश्वरें अशासाठीं कां निर्मिलें स्त्रियेला ?

—५—

बालपणापासोनी मी मित्र शोधिताहें
खरा मित्र मज्जीवाचा आज गवसलाहे—
जिवानें तसा भावानें पूजितों तयाला !

—६—

किती बेत आयुष्याचे आपणा सुचावे—
परी सौख्य अंतर्यामीं घडिघडी दुरावे !
सहचरीविना तें कधिं ना येत पूर्णतेला !

---

पुणें
ता० २७।११।१९३४.

---

**श्री. द. प. चिंचाळकर.** B. A. LL. B. (**अंमळनेर.**)—

**चहापान–निषेध**—हें पुस्तक हल्लींच्या आपल्या देशस्थितींत समाजाला निःसंशय उपकारक आहे. हिंदुस्थानांतील सर्व भाषांतून भाषांतर होण्यालायक हें पुस्तक आहे. **पुस्तकाची** भाषा आकर्षक व विवेचन साधार आहे. **विशेषत:** विद्यार्थ्यांनीं हें पुस्तक मनःपूर्वक वाचल्यास त्यांच्या ठिकाणीं सन्मार्गप्रवृत्ती खास उत्पन्न होईल.

कळी सत्ताविसावी

# डाकवाला.

ज्याचीं पत्रें येण्याचा संभव तोच डाकवाल्याची वाट
पहाणार आणि जास्त वाट पाहिली तर......तर......
त्या दिवशीं डाकवाला मुळीं येणारच नाहीं.

( जाति—झाल्या तिन्हीसांजा –यशवंत.)

अजुनि न कां येई ? का भास मला झाला ?
वाजति हे साडेनउ––कोणीं गुंतविला ?
पायींच्या वहाणा त्या अजुनि न करकरती !
वाट किती पाहूं—दिनदिन ही तद्रीती !
कागद–शाई–टाका बैसें घेवोनी !
हातांतुनि टांक गळे अन् जाई सुकुनी !
रोखोनी दृष्टी खिडकींतुनि बाहेरी
मिनिटामिनिटा पाहीं परतें माघारीं
केव्हां तासन्तासां खिडकींतच राहीं
पद येती मोडोनी — दुर्दम आशा ही !
ऐसें झुरुनी झुरुनी बसुनी राहावें
अन् त्यानें त्या दिवशीं मुळिंही ना यावें !
चिडुनी केव्हां बसतों मागें जावोनी
अचुकपणें त्या दिनिं ये पत्रां घेवोनी !

रत्नागिरी.
३०–३–१९३५.

कळी अठ्ठाविसावी–

# सद्‌गुरूंस तोटा नाहीं !

( राजहंस )

जा–इकडे तिकडे पाहीं—सद्‌गुरूंस तोटा नाहीं !
भेटेल मुंगि वाटेंत—शोधाला फिरतां फिरतां !
कानांत मंत्र देईल—'दूर दृष्टि ठेवीं आतां'
आणीक पुढें सांगेल—'हा मंत्र न माळेकरितां–
गुंतवूं नको माळेंत
राहुं दे सदा हृदयांत
उतरुं दे सर्व कार्यांत
जा बाळा विजयी होईं'—सद्‌गुरूंस तोटा नाहीं !

–२–

आक्रमितां पुढला मार्ग—वाटेंत आडवा ओढा
कोणापुढेंहि वाचील—अपुल्या कार्याचा पाढा
कोणाही उपदेशील—ज्यांसि अंतरीचा ओढा
'घेवोनि वळणें वळणें,
मधुनी मधुनी खळवळणें,
गंभीरहि कोठें होणें
संकटांसि तरुनी जाईं'—सद्‌गुरूंस तोटा नाहीं !

–३–

जाल जों जरासे पुढतीं—भेटेल वृक्ष आम्राचा
मध्यान्हकाळिं जळजाळित—उपयोग बहू छायेचा
अमित पांथ तरुतळिं येती—तृप्त होइ आत्मा त्यांचा

तो मुका वृक्ष बोलेल
'जा नको गमावूं वेळ
पर उपकारीं रमशील
तर मुक्ती धांवत येई'—सद्‌गुरूंस तोटा नाहीं !

-४-

जाईल काळ वेगानें—होईल रात्र करकरित
फेकतां दृष्टि आकाशीं—जणु छत हें रत्नें खाचित !
तारका तार करतील—अज्ञानाच्या तिमिरांत !
'जा प्रकाश पाडीं खूप
ज्ञानाचा उजळीं दीप
विद्येची वेला शिंप
अन् चमक दिशांना दाहीं—सद्‌गुरूंस तोटा नाहीं ।
ही परंपरा गुरुजींची—संपणार नाहीं कधिंही !
गादीवर दुसरा आला—तरि हिणकस ठरणें नाहीं
यां लोभ कनककांतेचा—असणार नाहिं केंव्हांही
जा अशाच गुरुला शरण
कर इतरां दुरुनी नमन
ते साधु न, भोंदू जाण
ओरडे निसर्ग सदाही—सद्‌गुरूंस तोटा नाहीं ।

खेर्डी (चिपळूण)
ता० १७-१०-३४

प्रकाशनः
चैतन्य, पुणें

कळी एकोणतिसावी—

# शनिवारवाड्यास !

( वृत्त—चंद्रकान्त. )

पेशवाइच्या दिव्य यशाचा शाहिर हा निधडा
गमतो मजला पुण्यपुरींचा शनीवारवाडा !

\+ \+ \+

दों शतकांवर वर्षांचा तो काळ सरकलेला
तेव्हांपासुनि आजवरी तूं उभा ठाकलेला
शूर बाजिच्या शौर्याचा तूं पोवाडा रचिला
खड्या सुरानें, वीरश्रीनें गाउन दावियला
महाराष्ट्रिचे शूर मराठे सदरेला जमले
पुण्यपुरीला हातीं घेउनि समशेरीं, भाले
शिवरायांचा भगवा ध्वज तूं गगनीं फडकाविला
हिंदूंचा एकला विसांवा जगता दाखविला !
वायव्येचा वाहुं लागला वारा अटकेला;
शनिवारांतुनि भाउ निघाला थेट उत्तरेला
त्या वेळीं तव साथ जाहला दिल्लीदरवाजा
शनिवारा तव मालक बनला दिल्लीचा राजा

\+ \+ \+

काळ नराही एकसारखा बदले वारंवार—
आजकालच वैभव उद्यां अवनतींत बुडणार ।

M-1881

जगविध्वंसक दुष्ट कलीनें पोखरलें घरदार
शनिवारा ! तुज कली बाधला ! देश बुडाला ठार—
हिंददेविची हृदयेच्छा ती वितळुनि गेली पार
सत्तेनें तिज निवास करण्या उरलें ना घरदार
मावळतीचा समुद्र उठला वादळ झालें फार
शनिवारा ! तव झेंडा पडला !! कोण उभा करणार ?

× × ×

तूं बनलासी विरक्त आतां त्रिदंड संन्यासी
स्मशानवैभव तुझें पाहतां खेद हो मनासी !
विस्तीर्ण असें व्यासपीठ, तूं त्यावरि प्रवचनकार
जाणारा येणारा पांथिक श्रोता तव बनणार !
सुखदुःखाच्या गतगोष्टी तूं त्याला समजाविणार
परी शेंकडा नव्याण्णव जन लक्ष नाहिं देणार !
तुला वाटतें, हिंदयुवक हे ऐसे कां बनले ?
पिढ्यापिढ्यांचें पारतंत्र्य या कारण रे झालें !
तुला ऊन ना पाउस तूं तव गाऱ्हाणें गाणार
नकळे केव्हां शोकगीत तव थांबविलें जाणार !

पुणें.
८-८-१९३४

कळी तिसावी—

# माते !—

जो अगदीं बाल्यांतच मातृहीन झालेला आहे त्याला मोठेपणीं '**तुझी आई कशी होती ?**' असा प्रश्न केल्यास तो याहून दुसरें काय म्हणणार ?

(वृत्त—मंदारमाला)

माते ! तुझा पुत्र आहे खरा मी
तरी त्वत्स्वरूपा नसें जाणत
माते ! तुझ्या पोटिं जन्मास आलों
तरी 'तूं कशी ?' ना मला माहित
आश्चर्य वाटेल कोणासही हें
परी यांत आश्चर्य कांहीं न गे
दुर्दैव माझें ! नसे अन्य कांहीं
कुठें रूप पाहूं तुझें सांग गे ?
असे पूर्वसंचीत दुष्कर्म मोठें
किती पाप केलें कुणा माहित
जन्मूनि वाढावया लागलों तोंच—
वाढूनि आलें असें संकट

अवस्था बरी ती जरी राहतों मी
तुझ्या पोटिं अज्ञात आजन्महीं
तुझी आणि माझी तुटातूट आई
अशी होति ना सत्य केव्हांचही
दिसे अन्य जी–मानितों तीस माता
तरी–'**तूंच ती**' हें म्हणूं मी कसें?
मुलामा दिसे तो सुवर्णापरी गे
परी मोल त्या सोनियाचें नसे!

---

इंदूर.
१७–८–१९३५

---

# "चहापान-निषेध"

**व्यायामः**–-(बडोदें) या विषयावर हा सुसंगत सविस्तर आणि शास्त्रीय चर्चा करणारा ग्रंथ प्रसिद्ध करून रा. शेंबेकर यांनीं मराठी वाचकांवर फार उपकार केले आहेत. प्रत्येक माणसानें हें पुस्तक एकदां अवश्य वाचावें.

कळी एकतिसावी–

# सांडलेली शाई !

( जाति—नृपममता. )

सांडली अरेरे शाई–
    मम मानस दुःखी होई–पाहुनी
लागला कुणाचा पाय
    तोंच ती पसरली हाय–चहुंकडे
दौतीचा बालेकिल्ला
    होतांच तयावर हल्ला–भंगला
दौतीचा गेला प्राण
    शाईची दाणादाण–जाहली
प्रेतापरि पसरे पाहीं
    चेतनाहि कांहीं नाहीं–राहिली
जाईना–गेला प्राण
    केव्हां तरी आहे मरण–यायचें
दौत जरी फुटुनी गेली
    दुःखाची गोष्ट न कसली–वाटते
परि दुःख एक गोष्टींत
    ती शाई झाली नष्ट–यापुढें
सामर्थ्य शाइचें कांहीं
    तुम्हांला माहित नाहीं–समजलां !

शाईच्या साह्यावीण
        लेखक ते सारे दीन–बनतिल
जरि रुसेल शाईबाई
        मग कशी कराल छपाई–सुंदर
टोंकासह टांक सजेल
        शाईविण तो बिनमोल–ठरतसे
शाईची होतां भेटी
        टांकाला पाझर फुटती–प्रीतिचे
त्यांच्या प्रीतीची खूण
        जें लिहाल तुम्हि लिखाण–तें असे !
या सांडेल्या शाईनें–
        लिहिलीं असतीं मी पानें–पांचशें
तो भावी मोठा ग्रंथ
        संपला याच शाईत–वाटतें !
ही शाई क्षुल्लक नाहीं
        ग्रंथांची आहे दाई–प्रेमळ
शाईला फेंकुनि देतां
        मनिं विचार करणें पुरता–यापुढें !

---

पुणें.
२४–१–१९३५.

प्रकाशन :
शालापत्रक, पुणें.

कळी बत्तिसावी–

# काजव्यास–

( जाति––वसंत )

–१–

चमक तूं काजव्या चमक
बजावी आपुला हक्क !
हांसती जरि तुला लोक
तरी तूं आपला चमक !

–२–

सृष्टीचें सान बालक तूं
विहरसी अंतरिक्षांत !
नेणसी अंत अंबरिंचा
तरी तुज भय नसे त्यांत !

–३–

सूर्य तेजोखनी पूर्ण
तारका शोभती भगिनी;
तयांचा धाकला बंधू
शोभवीतो सदा अवनी !

–४–

जरी तूं क्षुद्र दिसतोसी
चमकण्यावरि तुझें प्रेम !

मग अतां मानवानें कां
त्यजावा अंगींचा जोम ?

—५—

" कसाही येउं दे काळ
चमकणें त्या तशा काळा ! "
जगा तव हाचि सन्देश
असावा वाटतें मजला !

—६—

तुझा हा दिव्य सन्देश
कुणाचे येत ना ध्यानीं !
चमकले भूत काळांत
अतां तें आटलें पाणी !

---

खेर्डी. ( चिपळूण )
१५-१०-१९३५

प्रकाशन :
**मतिविकास, पुणें.**

---

**कळी तेहतिसावी-**

# मित्राशिवाय—

ज्यांची मैत्री अगदीं जिवाभावाची असेल त्यांनाच फक्त
या कवितेंतील रहस्य कळून येईल.

मित्राशिवाय जगतीं—ये जीवना कलंक
मित्राशिवाय मनुजा-हो नर्क स्वर्गलोक
मित्राशिवाय कोठें—हृदयास सांग खोलूं
मित्राशिवाय कोणा—हृद्भावनांस बोलूं ?
मित्राविना कुणाला—आनंद तो कथावा ?
आनंदवूनि त्याला—स्वानंद वाढवावा !
जइं दुःख हो मनाला—ओतूं कुठें तयाला
मित्राशिवाय बोला—तें कोण ऐकण्याला ?
नेत्रांत येत पाणी—तइं नेत्र पाणवाया
मित्राशिवाय सांगा—कोणी असे जगीं या ?
नाहीं मुळींच नाहीं—मी सांगतों तुम्हांही !
मित्राशिवाय जीवा—नाहीं सखा कुणीही
मित्रापरी मिळाया—असतात ते अनेक
पारि संकटांत पाठीं—सन्मित्र तोच एक
मित्राशिवाय कैसा—या जीवनास कंठूं
मित्राविना जगीं या-नाहीं अमोल वस्तू !!

---

पुणें.
२२-१२-१९३४

कळी चौतिसावी–

# काव्यालंकार

( तरी ही काव्याची सर्वांगीण व्याख्या नव्हे ! )

काव्याकारितां कशास खणतां शब्दांची खाण ?
साधे भोळे–शब्द मोकळे–काव्याचा प्राण !
लांब मैलभर–रुंद फूटभर शब्द कशाला ते ?
काव्याची ही 'आगिनगाडी' रुळांविना जाते !
काव्याचा तो प्राण एक त्या म्हणती चैतन्य !
चेतनेविना फिके पडती अलंकार अन्य !
रुद्राक्षाच्या अथवा तुलसीकाष्ठाच्या माळा
बैराग्याचा अलंकार हा शोभे काव्याला !
हिरेमाणकें–पाचूमोतीं–तीं खंडोगणतीं !
विगतचेतना प्रेतावरतीं का शोभा करती ?

---

पुणें.
१४–१–१९३५.

प्रकाशन :
चैतन्य, पुणें.
सप्टेंबर १९३५.

कळी पस्तीसावी–

# थाम्ब जरा मृत्यू !

थाम्ब जरा मृत्यू—फिरकुनी ये इकडे तिकडे
मज कर्तव्याचें—अजूनी गिरवूंदेत धडे !

जों आलों नाहीं—तोंच कां येसी नेण्याला ?
पाठविलें देवें—असे ना कार्या करण्याला

आलों जगतांत—किती तरि झाला आनंद
निश्चयिलें हृदयीं—तोडुं अन्यायाचे बंद !

या ध्येया स्मरुनी—अजवरी केले कार्याला
परि वाळूवरचा—शिंपला देच प्राण त्याला

सागरिं दडलेलीं—किती तरि आहेती रत्नें
सागर मंथोनी—काढुं दे वरतीं तीं यत्नें

जरी आज नेसी—तरी मम आशा राहील
मम कार्याभंवतीं—भुतापरि घिरट्या घालील

अन् माझ्यामागें—कार्य दे माझें करण्याला
अजुनी ना कोणी—दिसतसे पुढती आलेला

म्हणुनी ये फिरुनी—कुठें तरि कांहीं तरि वर्षें
त्यानंतर तुजला—मिठी मी मारिन बहु हर्षें

पारि आतां थांब—-फिरकुनी ये इकडे तिकडे
मज कर्तव्याचे—अजूनी गिरवूंदेत धडे !

---

इंदूर.
२५-८-१९३५

प्रकाशन :
केसरी, पुणें.

---

## महादेवशास्त्री दिवेकर :-

"........आपण लिहिलेला **चहापान-निषेध** हा ग्रंथ ( चहा-वरच्या वाङ्मयांत ) सर्वांत महत्त्वाचा आहे. चहाचा इतिहास, त्यापासून होणारी आर्थिक, शारीरिक व नैतिक हानि यांचें शब्दचित्र आपण फारच उठावदारपणें रेखाटलें आहे. हें पुस्तक जेथें जेथें वाचलें जाईल तेथें तेथें आपला प्रभाव करीलच. आपल्या या कार्याबद्दल मी आपलें अभिनंदन करतों."

**किं० १ रु. उमलत्या कळ्या घेणारास १२ आणे.**

कळी छत्तिसावी–

# माझी भगिनी !

मार्गानें जाणाऱ्या एका रुपयौवनसंपन्न मुग्ध बालेस पाहून—

( जाति—अगोठ. )

असोस कोणीही तूं—सुरम्यशी बाला !
मदीय भगिनी तूं गे—म्हणेन मी तुजला !
अगे अगे ताई ह्या—तुझाच कीं बंधू !
कितीकदां आतां गे—तुझ्या पदां वंदूं !
चुकार हरिणीपरि तूं—कशास बावरशी !
मुकें रहावें कां गे—स्वकीय बंधूशीं ?

\+ + +

असेल संशय ह्या तव—मनांत मुरलेला
'असे जरी बंधू–मग—कधीं न पाहियला !
'म्हणे जरी बंधू तरि—कधीं न येत घरीं !
'कसें म्हणावें सांगा—अशास भाउ तरी ?'

\+ + +

खरेंच हें आहे, कीं—नसें तवानुज मी !
खरीच ही गोष्ट असे—नसें तवाग्रज मी !
असें जरी आहे तरि—तुझाच मी भाऊ !
असेंच मी मानितसें—नकोस रागाऊं !!

बहीण भावांचे गे—मिळावया मान
अवश्य आहे का तें—सहोदरीं जनन ?
बहीण भावांची ती—जमावया गट्टी
अवश्य आहे का तें समान घरठाण ?
बहीण भावांसम गे—जमावया सौख्य
अवश्य आहे का तें—ससंग बालपण ?
बहीण भावांचें तें—जमावया नातें
अवश्य आहे का गे—समान धनमान ?
बहीण भावांसम ती—जमावया मैत्री
अवश्य एक अशी ही—समान मनमान !

\+ \+ \+

स्वजन्म घेऊनियां—समान उदरांत
कितीक दाविन मी तुज— जयां न मुळिं खंत !
स्वबंधुचे प्राणावरि— पहा सदा टपले
स्वकीय भगिनीचाही—लिलांव करतात !
स्वबंधु तन्नयनांना—दिसे बहू परका
असेल कोणी परका—तयां जवळतात !
स्वकीय बंधु तयांना—नको नयनकक्षीं !
परी कुणी परका जरि—तयास भजतात !
कशास परमेश्वर तो—अशां करी बंधू ?
सुरम्य बंधुत्वा–तव—विटंबना होत !

परी न मी बंधू गे——ठरीव रूढीनें
म्हणे तुला भगिनी मी——हृदीय भावानें !
खरोखरी लांछन हें——मला बहीण नसे
म्हणोनि तुजला बाले——बहीण मानितसें !
तुझ्यापरी भगिनी गे——जरी मिळेल मला !
'खरोखरी धन्य' असें——म्हणेन मी मजला !

---

पुणें.
२२-१-१९३५

प्रकाशन :
महाराष्ट्र-शारदा, मुंबई.
सप्टेंबर १९३५

---

## चहापान निषेध

**नवशक्ति** ( मुंबई ):——चहाचे दुष्परिणाम जितक्या ठळकपणें समाजापुढें मांडावयास पाहिजे होते तितक्या ठळकपणें आजपर्यंत ते कोणीही मांडले नव्हते. या पुस्तकांत ठिकठिकाणीं आधार दिले असल्यामुळें तें जास्तच परिणामकारक झालें आहे. चहाभक्तांच्या शंकाकुशंकांना समर्पक उत्तरें देऊन योग्य उपायही सुचविले आहेत.

कळी सदतिसावी—

# धांव !

सायंकाळीं सर परशुरामभाऊ कॉलेजच्या क्रीडांगणावर एकनिष्ठेनें दौड करणाऱ्या बालकास पाहून—

धांव धांव धांव असा बालका अतां—
हीच तुझी दौड उद्धरील भारता !
अंजनिसुत धांव घेइ कवळण्या रवी
शाकुन्तल भरत वनीं सिंह वांकवी
यमसदनीं राम त्राटिकेस पाठवी
यमुनाह्रदिं कृष्ण कालियास कालवी—
भाससि मज तूंहि त्यां समान तत्त्वतां !
अथवा ध्रुव धांव घेइ ईशकारणीं—
पार्थपुत्र अभिमन्यू घुसतसे रणीं
भद्रायू जात त्वरें पितृरक्षणीं—
तूंहि तसा बाळ धांव घेसि अंगणीं
कोण तुला मार्ग असा सांग दाविता ?
खेळगडी इतर तुझे घट्ट बैसले
त्यांनिं नाहिं काय तुझे पाय ओढले ?
पाहुनियां तुज दौडत हंसत राहिले
परि कांहीं तूं मनांत नाहिं आणिलें
वीरासम—तीरासम—धांवधांवतां !

काढोनी छाति पुढें डौलदारशी !
सिंहासम क्रीडांगणिं घेसि तूं उशी
सिंहाचा छावा तूं भीति तुज कशी ?
भीति सदा मानवांस पाडिते फशी
 धैर्य हाच पुरुषा पुरुपार्थ तत्त्वतां !
शिवरायें दौडविला शूर मावळा
तानाजी सिंहगडा धांव धांवला
प्राण पणा लावुनियां तोहि अर्पिला
विजयाची माला परि घेतली गळां !
 'विजय' हीच मृत शूरां अजर-अमरता !
कार्य हो न कांहिं धांव घेतल्याविना
उपयोगीं काय मनीं बैठि भावना
बालक तूं तरि तव संदेश मन्मना
वाटतसे वेदवच जिवंत चेतना !
 पाहुं नको पाठिं बाळ दौडदौडतां
 धांव धांव धांव असा बालका अतां

---

पुणें
४-२-३५

प्रकाशन :
केसरी, पुणें
१५-३-३५

कळी अडतिसावी–

## गीता उपदेशिली–

श्रीकृष्णें गाइली
अर्जुना गीता उपदेशिली ! ध्रु०

पाहुनी आप्तसंबंधी रणरंगणीं
युद्धास सिद्ध शस्त्रास्त्रें सरसावुनी !
कळवळा येतसे त्या पार्थाचे मनीं
'यां कसें वधावें--स्वकीय हे तों–'

हरिनें तइं गाइली
अर्जुना गीता उपदेशिली !

'कां क्लीबासम निर्वीर्य जाहला बरें ?
तूं शूर जातिचा क्षत्रिय अससी बरें !
तव आप्त दुष्ट ते मानव नसती खरे !
ते शत्रु तयांना वधीं जाउनी'

ऐशी हरिनें भली
अर्जुना गीता उपदेशिली !

कर्तव्यकर्म प्राणाधिक आशेविणें
कर्तव्यासाठीं भलें प्राण वेंचणें
परि नको नको तें भागुबाइचें जिणें !
'चल ऊठ–धनुष्या लावि बाण हा'

हरिनें वचनावली !
अर्जुना गीता उपदेशिली !
धृतराष्ट्रसुतांनीं तुला असें गांजिलें
तव हक्क तयांनीं सारे धुडकावले !
परतंत्र जिणें-या म्हणसी कां तूं भलें ?
स्वातंत्र्य हक्क तव जन्म सिद्ध रे !
लढ त्यासाठीं मुळीं
भारता गीता उपदेशिली !

---

पुणें.
१४-१२-३४

प्रकाशन :
केसरी, पुणें.
२१-१२-१९३४.

---

## चहापान निषेध

" २५० पानांचें चहापान निषेधाचें हें पुस्तक अत्यंत वाचनीय तर आहेच; पण त्यायोगें आपल्या देशाचें किती भयंकर नुकसान होत आहे हें पाहिलें म्हणजे या पुस्तकाचा निरनिराळ्या संस्थांनीं प्रचार कार्यास शक्य तितका अधिक उपयोग करावा व ही अनर्थपरंपरा टाळावी असें आम्हांला सुचवावेसें वाटतें. पुस्तक अत्यंत उपयुक्त व संग्रहणीय झालें आहे. अंतरंगाप्रमाणें बहिरंगही उत्कृष्ट आहे. "

--मुलांचें मासिक, नागपूर.

कळी एकूणचाळिसावी-

# फुलें आणि मुलें !

पहांट झाली आतांची- –कळी उमलली जाईची
अरुणोदय होऊं आला–-गुलाब पसरी वदनाला
उद्यांनीं—सुमनांनीं—उमलोनी-
गंध चहुं दिशां उधळीला—जनमानस तोषविण्याला !

कळ्या उमलल्या जों जगतीं—कळे कांहिंसें तयांप्रती !
अपाप ऐसें मन त्यांचें—डाव न जाणें जगतींचें !
घेति मनीं—"लोकांनीं—प्रेमांनीं-
आम्हां हृदयाशीं धरूनी—चुंबन घ्यावें फिरफिरुनी !"

सुमें इच्छिती असें मनीं—उद्यानीं तों ये कोणी
अनेक सुमनें तोडोनी—दुष्ट स्वहस्तीं घेओनी
हातांनीं—त्यां चुरुनी—टाकोनी-
भूमीवरती- जाई पुढें—फुलांमुलांना येइ रडें !

\+ + +

मुलें !–फूलें देवा घरचीं–जगतीं तीं जन्मायाचीं !
सुमसम हंसऱ्या वदनाचीं–जनांस तीं हसवायाचीं
बोलानें—लीलेनें—वदनानें-
हंसऱ्या; तोषवितात जनां–सांगाया हें नको कुणा !
मुलें वयाला जों येती–कळे कांहिंसें तयांप्रती
निष्पाप मनीं ये लहर–थोरांपरि व्हावें थोर !

होण्याला---थोर भला---करण्याला
लागे, थोर कृती जगतीं-कळे सर्व हें तयांप्रती !
फुलांमुलांचें साम्य असें-परिणामीं तें तसें दिसे !
निष्पाप अशा त्या लहरी-दडपुनि टाकी कोण बरी ?
पारि 'लहरी'—दिसति जरी—तरी....तरी....
सुफलदायका त्या असतां-मग कां सांगा दडपीतां ???

---

रत्नागिरी.
१६-३-१९३२

---

कळी चाळिसावी—

# सह्याद्रीस

( जाति—मोहिनी. )

सह्याद्री स्तुतीला पात्र आहेच. पण स्तुती करायचीच तर ती गतकाळाची करावी लागते. सध्यां तो झोंपाळू बनल्यासारखा दिसतो, नाहीं का ?

सह्यगिरे गेला कोठें तुझा तो दरारा !
असा गप्प कां बसलासी कारें जरा विचारा ! ध्रु०
तुझ्या रुक्ष खडकांतूनी देशभक्त झाले
तुझ्या मठ्ठ मातींतूनी मावळे मिळाले
अतां देसि जन्म मवाळां हाच काय तोरा ?
लाडका तुझा तो शिवाजी खिन्न होत स्वर्गीं
आवडता तुमचा ताना नाहिं सौख्यमार्गीं
ढाळितात वरूनी अश्रू—उघडिं नेत्र वीरा !
तुझ्या गर्द झाडींतूनी निघाले नृसिंह
नद्यांतुनी चैतन्याचा वाहला प्रवाह
पिसाळले कोल्हे आतां, पंक वाहि सारा !
अंगिं तईं स्वातंत्र्याचें संचरेच वारें
पुण्यामध्यें शिवजी खेळे खेळ असे सारे
अतां तिथे चेंडूफळिचा माजला पसारा !

प्राण दिले तव पुत्रांनीं देशरक्षणार्थ
आतां काय? जिकडे तिकडे पसरलाच स्वार्थ
प्राण घेति बंधुजनांचे हा अनर्थ सारा!
असा झोंप कां घेतोसी? काळ कठीण
तुझ्याविन विद्युद्दीपा * पेटवील कोण?
स्मरण करीं गतकाळाचें अलस सोडिं सारा!

---

पुणें.
७-१२-१९३४.

---

* खरोखरींचा "विद्युद्दीप" पेटवायलासुद्धां सह्याद्रीच वीज देतो.

कळी एकेचाळिसावी—

## खरे जरि—

(गज्जल.)

खरे जरि पुत्र मातेचे
खरे राष्ट्रीय बाण्याचे!
खरे जरि आर्यवृत्ताचे
न दिन हे झोंप घेण्याचे!!

---

पुणें.
२२-७-१९३४.

कळी बेचाळिसावी–

# हुरहूर !

( जाति--नवती )

नवपरिणित वधुवरांचें प्रेमळ जोडपें. पतीस घरीं येण्यास नेहमींपेक्षां आज बराच उशीर होऊं लागल्यामुळें पत्नीच्या मनास साहजिकच फार हुरहूर लागली आहे !

दीप लागले–परि न कुठें 'ते' दिसती, काय जाहलें !
रोजची घडी–चुकली कां आज बरें ? कां अशी अढी ?
वाजती अती–सायकलींच्या घंटा--ऐकूं ये न 'ती'
बोलती जन–परि 'तो' आवाज कांहीं कानिं येत न !
तारका वरी–लुकलुकती, हंसती, आल्हाद ना परी !
चंद्र चोरटा–लपत छपत क्षितिजावरि लावि बावटा !
तारकावली–चंद्रानन पाहुनि गालांत हांसली !
हृदय धडधडे–अंत नका पाहूं अतां–सांगतें गडे !
मित्र हे कसे ?–राजहंस हृदयाचा दडविला असे !
येउंदे दया–झटपट या सदना अन् दर्शनास द्या !
भास घडिघडी–होत तसा दाराची काढितें कडी !
कोणि ना परी–वाढतसे हृदयींची हूड हुरहुरी !
टिकटिके घडी–वाजले नऊ परंतु अजुनि कां दडी ?

---

रत्नागिरी.
२२-३-१९३४.

## कळी पंचेचाळिसावी–

# उदय !

( केशव करणी )

ऊठ झडकरीं–ऊठ सत्वरीं तरुणा गातो कवी
उदेला नभःप्रांगणीं रवी !
आकाशाच्या रंगभूवारि बालरवी प्रगटला
दाविण्या मार्ग जनांना भला !
तिमिरकृत मालिन्य सर्वही गेलें अपुल्या घरा
प्रगटला चैतन्याचा झरा !
दिशा उजळल्या अनुरागानें रक्तवर्ण जाहल्या !
कळ्याही पहा हंसू लागल्या !
जाई फुलली, जुई उमलली, गुलाब हंसरा हंसे
जगाला जणूं धडा देतसे !
झाडावरतीं किलबिल शब्दीं स्फूर्तिगीत गातसे
पक्षिगण चैतन्याचे ठसे !
क्षणार्धांत ते घेति भरारी कर्तव्य-प्रांगणीं
तयांना ठावें एकच मनीं–
भारतपुत्रा, तूंच दिसासि कां दुर्मुखलेला असा ?
उघडिं तर नेत्र अतां डोळसा !

बालरवी तुज हांक मारितो उदयगिरीवरतुनी
तरुणा होई जागृत जणीं !
ऊठ झणीं तूं घेइं भरारी कर्तव्य-प्रांगणीं
आत्मविश्वास असूंदे मनीं !
क्षुद्र बुद्धिचे विचार सगळे फेकुनि दे तत्त्वतां
कशाला विचार करिशी अतां ?
ध्येय ठरवुनी ध्येयासाठीं प्राण पणा लाव तूं
यशस्वी निश्चित होशील तूं !
ध्येय असूंदे उच्च, न चिंता येई अपयश जरी
नको तें क्षुद्र ध्येय अंतरीं !
तरीच होइल राष्ट्रोदय हें सदा मनीं वागवीं
उदेला कर्तव्याचा रवी !

---

रत्नागिरी
१९३३

प्रकाशन :
किर्लोस्कर, औंध.

## कळी सेहेचाळीसावी

# खेळ !

( अंजनीगीत )

भातुकलीचे खेळ तर मुलांनीं खेळावेच; पण मधून मधून कल्पनेनेंच कां होईना अशा खेळांचीही संवय ठेवावी. कळकळीनें 'कळ' दाबली कीं कल्पनेचें कार्यांत रूपांतर होतें.

**सर्वजण:** नव चैतन्योत्पादक ऐशा
खेळां खेळूं या !

\+ + +

**सुभाष:** मी बघ होतों टिळक पुण्याचा–
संपादक त्या सु-केसरीचा–
मंडालेला जातों साचा–
बंदी होउनियां !
कारागृहिं मी लिहीन **गीता**–
**रहस्य** मोठा ग्रंथ तत्त्वता;
शांतिलाभ होईल मम चित्ता
तत्त्वा गांठुनियां !

**मोहन:** मी तर होतों श्रीशिवराया
गोब्राह्मण-प्रतिपाळ कराया
स्वराज्य अपुलें कीं स्थापाया
धर्मा रक्षाया !

**सुरेश:**
मी मग होईन पूज्य महात्मा
सत्याग्रह मम शस्त्र तत्त्वतां
तयापुढें मी नमविन सत्ता
शांती धरुनीया !

**संजीवनी:**
मी होइन झांशीची राणी !
शौर्य तेज धैर्याची खाणी !
चकाकणारी जणूं हिरकणी
दिपविन जगताला !
स्वतंत्रतेस्तव युद्ध करीन !
तटावरूनी घोडा फेंकिन
शौर्याची रणिं शर्थ करीन
अर्पिन प्राणाला !

**नरेंद्र:**
नरेंद्र मी हा इंद्र नरांचा
स्वामि विवेकानंदाचि साचा
उभविन ध्वज हिंदू धर्माचा
दाहि दिशांना मी ! !

रत्नागिरी
१९३३

प्रकाशन:
मुलांचें मासिक, नागपूर.
मार्च १९३४.

कळी सत्तेचाळिसावी–

# गुणाची जाहली माती !

आजकालचें शब्दचित्र.

( जाति—वसंत )

वशील्याची अतां महती–
गुणाची जाहली माती ! ध्रु०
वशीला जाहला देव
लोक त्याची करी भक्ती
तोच तो कल्पवृक्ष खरा
गुणाची जाहली माती !
कुठेंही जा तुम्ही आतां
कोणता प्रांत घ्या हातीं !
मुखांतुन शब्द येतील
'गुणाची जाहली माती !'
नको तें ज्ञान संपादूं–
वशील्याची करीं भक्ती !
तोच तो मुक्ति देईल
गुणाची जाहली माती ! !
गुणाचें संपलें मोल
कुणाला ना कळे महती !
वशीला हेंच गुणशील
गुणाची जाहली माती !

फळें वा घेउनी भाजी
धांव घ्या, धांव घ्या मोठी !
सरकवा 'नोट' * वा पुढतीं
गुणाची जाहली माती !
कुणी जो श्रेष्ठ अधिकारी
तयाची घ्या आतां चिठ्ठी !
तीच ती '**पात्रता**' तुमची
गुणाची जाहली माती ! !
कुणी जो श्रेष्ठ अधिकारी
पडा त्याच्या पदीं-हातीं !
स्मरा त्याचें मुखें नाम !
गुणाची जाहली माती !

---

इंदूर.
२४-८-३५.

---

* कमींत कमी १० रुपयांची.

---

## —चहापान-निषेध—

**श्री. वि. य. भागवत.** B. A. LL. B. **(चाळीसगांव):—**

आपण फार परिश्रम करून व आधार देऊन पुस्तक लिहिलें आहे व त्यांतील निरनिराळे भाग उपयुक्त असून मननीय आहेत. प्रत्येक भागांत मननीय माहिती आहे याबद्दल आपलें अभिनंदन करावें तेवढें थोडेंच होईल.

कळी अठ्ठेचाळिसावी–

# प्रेमाची ऐशी रीत !

राधा आपल्या एका जिवलग मैत्रिणीला आपल्या
प्रेमाची गोष्ट सांगत आहे.

( अङ्कुर. )

अशि दचकुं नको सखये तव हृदयांत
प्रेमाची ऐशी रीत ! ध्रु०
त्या कृष्णाचा ध्यास घेतला हृदयीं
कां ? मलाच ठाउक नाहीं !
संसाराचें काम न कांहीं सुचतें
मन अधीर होउनि जातें !
जरि बसतें मी ते तांदुळ निवडाया
चित्त परी नसतें ठायां !
ठेवुनि देतें चुलिवरतीं तो भात
नेहमींच करपुनि जात !
त्या आमटींत तिखटमीठ ना पडत !
फोडणीहि तैशी जळत !
जलकुंभाला समजुनि 'ताक' मनांत
पानांत तेंहि वाढीत !
विहिरींवरुनी येतांना सदनांत
नेहमीं पाय चुकतात !

धारेसाठीं नाहिं वासरु सोडीत
पारि गायच सोडुनि देत !
ही अशी सदाची भुरळ
बोलती टोंचुनी सकळ
पारि तीच भावना प्रबळ !
वारें ऐसें सळसळतें देहांत
प्रेमाची ऐशी रीत !
हे श्रीकृष्णा, ऐकूं दे तव मुरली–
आशा मनिं एकच उरली
तव मुरलीचें वेड मला रे जडलें
मोहाचे पाशीं पडलें !
ती ऐकोनी पशुपक्षी डुलतात–
वाराही थबकुनि जात
ती परिसोनी झाडें होतिं तटस्थ
सरिताही नाहिं वहात
नादावर त्या मोर नृत्य करीत
अंबरीं मेघ फिरतात
ती नाहिं कशी मनुजा मोहविणार ?
स्त्रीहृदय तरी झुलणार ?
श्रीकृष्णा, तूं माझा मीहि तुझीच–
प्रेमाचा लेख असाच

या प्रेमाला जन वानो वा निंदो
कोणीही कैसें प्रवदो !
सत्त्वाचें प्रेम असे हें–
प्रेमाचें सत्त्व असे हें–
सर्वांना सांगत आहे–
मज कोणीही कांहीं बाइ म्हणोत
प्रेमाची ऐशी रीत !

———

इंदूर.
२१-८-३५

कळी एकुणपन्नासावी–

# वयाची कशास मातब्बरी !

( केशवकरणी )

श्रीकृष्णानें शैशवींच ते राक्षस संमर्दिले
कालियाचे मणके मोडिले !
श्रीरामानें बालपणीं त्राटकेस संहारुनी
भंगिलें शिवधनु लव हांसुनी !
आद्यशंकराचार्यांनीं हिंदूधर्मा रक्षिलें
किती तरि वय होतें कोंवळें !
ज्ञानोबांनीं बालपणीं ती रचिली ज्ञानेश्वरी
पहा कशि खळखळते वैखरी !
बालवयामधिं शिवरायानें खाटकास कापिलें
स्वराज्याचें आडें उभाविलें
माधवरावें पानपतींची जखम भरुनि काढिली
झडकरीं तों यात्रा संपली !
ऐन विशीला लक्ष्मी विद्युल्लतेपरी चमकली
असोनी जातीची स्त्री भली !
बालपणीं निज काव्य गाउनी बालकवी वारले
कवनिं परि अजरामर जाहले !

तेजाला त्या खुलवायाला वय नाहीं लागत
वयाची नाहीं मुळिं किंमत !
चपळपणा शरिराबुद्धीचा तारुण्यीं खुलतसे
कशाची मनास पर्वा नसे !
आंठ्या पाडुनि कपाळास कां नाक मुरडतां तरी ?
वयाची कशास मातब्बरी ?

---

इंदूर.
२३–८–३५.

प्रकाशन:
केसरी, पुणें

कळी पन्नासावी–

# रसिकांस–

हा कवी तुम्हां रंजवी
        गाउनी कवना
त्याचीच एक प्रार्थना असे रसिकांना !
मम काव्य नसे मुळिं श्राव्य
        असें जरि वाटे
विनवितों—मजवरी मोडुं नका परि बोटें !
चेतना जरी देसिना
        नको तरि ओढूं
ओढुनी पाय—खालतीं नको मज पाडूं !
मम भलें हृदय कोंवळें
        ना तरि फुटेल
अन् होतिल साऱ्या आशा मातमोल !
दाखवीं दोष वाजवी
        परि नको निंदूं
मी तुझाच ना तरि रसिका आहें बंधू ?

---

इंदूर.
२३–८–३५.